दिनदयाळ उपाध्याय ग्रामज्योती योजनेअंतर्गत, राज्यस्तरीय स्थायी समितीचे ( State Level Standing Committee ) गठण करणेबाबत...

**महाराष्ट्र शासन**
**उद्योग,ऊर्जा व कामगार विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : दिदयो -२०१५/प्र.क्र.१४७/ऊर्जा-५**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक : २४ एप्रिल, २०१५.

**प्रस्तावना :**

ग्रामीण भागातील वाढती ग्राहक संख्या, आधुनिक जीवन शैलीचा मुक्त वापर यामुळे सद्य:स्थितीत अस्तित्वात असणाऱ्या वीज वितरण प्रणालीचे विस्तारीकरण / सक्षमीकरण करणे कालानुरुप गरजेचे होऊन बसले आहे. ग्रामीण भागात वीज क्षेत्रातील पायाभूत सुविधा निर्माण करण्याकरिता केंद्र शासन पुरस्कृत दिनदयाळ उपाध्याय ग्रामज्योती योजना महाराष्ट्र राज्यात महावितरण कंपनीमार्फत राबविणे प्रस्तावित आहे.

२.दिनदयाळ उपाध्याय ग्रामज्योती योजनेची ( DDUGJY ) उद्दिष्टे थोडक्यात खालीलप्रमाणे आहेत :-

अ) ग्रामीण भागातील सामायिक फिडरवरुन वीज पुरवठा होत असलेल्या अकृषिक ग्राहकांना स्वतंत्र फिडरद्वारे २४ X ७ वीज पुरवठा करणे. ग्रामीण भागातील कृषी व अकृषिक फिडर विलगीकरण करणे.

ब) ग्रामीण भागातील वीज वितरण प्रणालीचे सक्षमीकरण, श्रेणीचर्धन, बळकटीकरण करणे. वीज वितरण प्रणालीतील वीज हानीचे योग्य मोजमाप करण्यासाठी ऊर्जा अंकेक्शन (Energy Audit) महत्वाचे असल्याने, यासाठी ग्राहकांकडील तसेच वीज वितरण रोहित्र व फिडर यावर योग्य क्षमतेचे मिटर लावणे.

क) १२ व्या व १३ व्या पंचवार्षिक योजनेत ग्रामीण विद्युतीकरण अंतर्गत राबविण्यात येत असलेली “राजीव गांधी ग्रामीण विद्युतीकरण योजना” याखालील चालू तसेच प्रस्तावित कामे दिनदयाळ उपाध्याय ग्रामज्योती योजनेमध्ये अंतर्भूत करणे.

३. दिनदयाळ उपाध्याय ग्रामज्योती योजनेसाठी केंद्र शासनाने तयार केलेल्या मार्गदर्शक सूचनांनुसार, राज्य शासनाने राज्यस्तरीय स्थायी समिती ( State Level Standing Committee ) गठित करणे बंधनकारक आहे. त्यानुसार राज्यस्तरीय स्थायी समिती ( State Level Standing Committee) गठित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. याबाबत शासनाने खालीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णय :-**

दिनदयाळ उपाध्याय ग्रामज्योती योजनेअंतर्गत केंद्र शासनाने सुचित केल्याप्रमाणे राज्यात राज्यस्तरीय स्थायी समितीचे ( State Level Standing Committee ) गठण करण्यास याद्वारे शासनाची मंजूरी देण्यात येत आहे. सदर समिती खालीलप्रमाणे गठीत करण्यात येत आहे.

| | | |
|---|---|---|
| मा.मुख्य सचिव | - | अध्यक्ष |
| अपर मुख्य सचिव (वित्त) | - | सदस्य |
| अपर मुख्य सचिव (महसूल) | - | सदस्य |
| प्रधान सचिव (ग्रामविकास व पंचायती राज) | - | सदस्य |
| प्रधान सचिव (वन विभाग) | - | सदस्य |
| आरईसी चे प्रतिनिधी | - | सदस्य |
| प्रधान सचिव (ऊर्जा) | - | सदस्य सचिव |

२. राज्यस्तरीय स्थायी समितीची ( State Level Standing Committee ) कर्तव्ये व जबाबदाऱ्या साधारणत: पुढीलप्रमाणे राहतील :-

१) महावितरण कंपनीने तयार केलेले डीपीआर (नॅशनल ऑप्टीकल फायबर नेटवर्कद्वारे महावितरण कार्यालये जोडण्याविषयीच्या डीपीआरसह ) तपासणे व पुढे आरईसीमार्फत मॉनिटरींग कमिटीच्या मंजूरीकरिता शिफारस करुन पाठविणे.

२) केंद्र पुरस्कृत अन्य योजनांमध्ये प्रस्तावित योजनेच्या कामांचे डुप्लीकेशन / ओव्हरलॅपिंग झालेले नाही याची खात्री करणे.

३) या योजनेच्या विकासावर लक्ष ठेवणे, कामाच्या दर्जावर सनियंत्रण ठेवणे, योजनेमधील मंजूर कामांची अंमलबजावणी करतेवेळी येणारे अडथळे दूर करणे, जसे की उपकेंद्राच्या जागा ताब्यात घेताना येणारे अडथळे, वाहिन्या उभारताना मार्गिकेंमध्ये येणारे अडथळे ( ROW ) , वन विभागाची मंजूरी, रेल्वेची मंजूरी, सुरक्षाविषयक मंजूरी इत्यादी.

३. वरील समितीच्या बैठका आवश्यकतेनुसार घेण्यात येतील किंवा तातडीनुसार चक्रीय पध्दतीने समितीचे कामकाज पूर्ण करण्यात येईल.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०१५०४२४१२३६२५९६१० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

INAMDAR SIRAJ MANJAMIYA

Digitally signed by INAMDAR SIRAJ MANJAMIYA
DN: CN = INAMDAR SIRAJ MANJAMIYA, C = IN, S = Maharashtra, O = GOVERNMENT OF MAHARASHTRA, OU = INDUSTRY ENERGY AND LABOUR,CID - 918056
Date: 2015.04.24 18:31:18 +05'30'

**(सि.मं.इनामदार)**
**शासनाचे सह सचिव**

**प्रत,**

मा.राज्यपाल यांचे प्रधान सचिव
मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
मा. मंत्री(ऊर्जा) यांचे खाजगी सचिव
मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई-३२
अपर मुख्य सचिव (वित्त), वित्त विभाग,मंत्रालय, मुंबई-३२
अपर मुख्य सचिव (महसूल), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
प्रधान सचिव (ऊर्जा) ,उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई ३२.
प्रधान सचिव (ग्रामविकास व पंचायती राज),ग्रामविकास विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
प्रधान सचिव (वने), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य विद्युत वितरण कंपनी, प्रकाशगड, मुंबई - ५१
सर्व विभागीय आयुक्त
सर्व जिल्हाधिकारी
सर्व कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद
सर्व कार्यासने ( ऊर्जा), मंत्रालय, मुंबई.
निवड नस्ती- ऊर्जा-५